शिवशस्त्रशौर्यगाथा प्रदर्शनाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने श्री छत्रपती शिवाजी महाराज संग्रहालय, सातारा येथील मुख्य दरवाजाला मेटल डिटेक्टर बसविणेबाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संग्रह-२०२४/प्र.क्र.१५३/सां.का.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १२ जुलै, २०२४

**वाचा** :- संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.संग्रह-२५२०/सातारा/मेटलडिटेक्टर-२०२४/२०३९, दि.२८.०६.२०२४

**प्रस्तावना** :-

छत्रपती शिवाजी महाराज यांचा ३५० वा राज्याभिषेक सोहोळ्याच्या निमित्ताने महाराष्ट्र शासनाद्वारे "शिवशस्त्रशौर्यगाथा" या प्रदर्शनाचे आयोजन करण्यात येत आहे. या प्रदर्शनाचा एक भाग म्हणून लंडन येथील व्हिक्टोरिया आणि अल्बर्ट संग्रहालयात संग्रहित छत्रपती शिवाजी महाराजांची वाघनखे जनसामान्यांना पाहण्याकरिता प्रदर्शित करण्यात येणार आहेत. सदर वाघनखे महाराष्ट्रात आणण्याकरिता व्हिक्टोरिया आणि अल्बर्ट संग्रहालय, लंडन व पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, महाराष्ट्र शासन यांचा दरम्यान सामंजस्य करार करण्यात आला आहे. सदर वाघनखे सातारा, कोल्हापूर, नागपूर व मुंबई येथे प्रदर्शनार्थ ठेवण्यात येणार आहेत. त्यानुषंगाने प्रदर्शन ठिकाणची आणि वाघनखे प्रदर्शन दालनाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने मुख्य दरवाजाला मेटल डिटेक्टर बसविणे आवश्यक आहे. त्यानुसार सहायक अभिरक्षक, सातारा संग्रहालय यांनी स्थानिक पुरवठादारांकडून दरपत्रके मागविली असून प्राप्त दरपत्रकापैकी युनिवर्सल सर्विलेंस, सातारा यांचे दरपत्रकातील दर हे सर्वात न्यूनतम आहेत. त्यांच्या दरपत्रकातील दराप्रमाणे प्रदर्शन ठिकाणच्या मुख्य प्रवेशद्वारावर मेटल डिटेक्टर बसविणेकरीता रु.५,६५,८१०/- (सर्व करासहीत) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी केली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

०१. "शिवशस्त्रशौर्यगाथा" प्रदर्शनाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने श्री छत्रपती शिवाजी महाराज संग्रहालय, सातारा येथील मुख्य दरवाजाला मेटल डिटेक्टर बसविणेबाबतच्या रु.५,६५,८१०/- (अक्षरी पाच लक्ष पासष्ठ हजार आठशे दहा मात्र) (सर्व करासह) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी मागणी क्र. झेडडी ०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृति (०१) (०२) विविध वस्तु संग्रहालयातील विशिष्ट विभागाची पुनर्रचना व विकास (राज्य) (कार्यक्रम) (२२०५ १३२९) २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षातील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानाच्या उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१२१७५४११७२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2024.07.12 18:05:51 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

प्रधान सचिव (सां.का.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहायक अभिरक्षक, श्रीछत्रपती शिवाजी महाराज संग्रहालय, सातारा.
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषाधिकारी, सातारा.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३.